**गावांचा विकास करण्याकरिता लहान ग्रामपंचायती स्थापन करणेबाबतची व्यवहार्यता तपासणे तसेच स्वतंत्र/ नविन/त्रिशंकू भाग यासाठी ग्रामपंचायत स्थापने करिता सुधारित निकष ठरविण्याकरीता समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विसआ-२०१५/प्र.क्र.१९९/पं.रा-४**
बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: १४ डिसेंबर, २०१६.

वाचा :- शासन निर्णय समक्रमांक दिनांक १३ जून, २०१६

प्रस्तावना :-

गावांचा विकास करण्याकरिता लहान ग्रामपंचायती स्थापन करणेबाबतची व्यवहार्यता तपासणे तसेच, स्वतंत्र/नविन/त्रिशंकु भाग यासाठी ग्रामपंचायत स्थापनेकरिता सुधारीत निकष ठरविण्यासाठी वाचा येथील शासन निर्णयान्वये समिती स्थापन करण्यात आली आहे.

सदरील समितीस आपला अहवाल शासनास सादर करण्याकरिता दोन महिन्यांचा कालावधी देण्यात आला होता. तथापि, प्रस्तुत विषयाचे व्यापक स्वरुप तसेच, त्याबाबत राज्यातील मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व तसेच, इतर सर्व संबंधितांकडून अभिप्राय/शिफारशी घेऊन त्यानुसार विविध मुद्दयांच्या अनुषंगाने अहवाल सादर करण्यास मुदतवाढ देण्याची विनंती समितीचे अध्यक्ष तथा विभागीय आयुक्त, अमरावती यांनी केली आहे. त्यास अनुसरुन प्रस्तुत प्रकरणी समितीस आपला परिपूर्ण अहवाल शासनास सादर करण्याकरिता मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

गावांचा विकास करण्याकरिता लहान ग्रामपंचायती स्थापन करणेबाबतची व्यवहार्यता तपासणे तसेच स्वतंत्र/नविन/त्रिशंकू भाग यासाठी ग्रामपंचायत स्थापने करिता सुधारित निकष ठरविण्याकरीता शासनास अहवाल सादर करण्याकरिता विभागीय आयुक्त, अमरावती विभाग यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या समितीस आपला अहवाल शासनास सादर करण्याकरिता दिनांक ३१

जानेवारी, २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. समितीने संबंधितांकडून तात्काळ अभिप्राय/शिफारशी घेऊन विहीत मुदतीतच आपला परिपूर्ण अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२१४१२४०१२७४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay R Bankar

Digitally signed by Sanjay R Bankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, cn=Sanjay R Bankar
Date: 2016.12.14 13:03:10 +05'30'

**( संजय बनकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
४. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. विभागीय आयुक्त, सर्व
७. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग
८. श्री. दिपक सिंगला, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ
९. श्री. पारस बोथरा, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग
१०.श्री. राजाराम झेंडे, उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग
११.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१२.माहिती तंत्रज्ञान ,कक्ष (ग्रा.वि. व ज.सं.वि) ,बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई
१३.निवडनस्ती, कार्यासन पं.रा.-४